**मौजे निळा, ता.पुर्णा, जि.परभणी येथे पूरग्रस्त पुनर्वसनाअंतर्गत बांधण्यात आलेल्या शिल्लक घरकुलांचे विक्रीस मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः- एफएलडी-२०१८/प्र.क्र.१९०/र-१२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- १५ जानेवारी, २०२०

**वाचा -**

१) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र.सीएलएस-११-०५/प्र.क्र.२३९/म-३, दि.९.१.२००६
२) विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांचे जा. क्र.२०१८/पुनर्वसन/कक्ष-१/कावि-१९६९, दि.२६.८.२०१९
३) जिल्हाधिकारी, परभणी यांचे जा. क्र.२०१९/पुनर्वसन/कावि-५५७, दि.३०.८.२०१९
४) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र.एफएलडी २०१८/प्र.क्र.१९०/र-१२ दि.३०.५.२०१९

**प्रस्तावना -**

शासन निर्णय दि.०९.०१.२००६ अन्वये, सन २००५ मधील अतिवृष्टी व पूर यामुळे बाधित राज्यातील १५ जिल्ह्यातील सुमारे १०,००० घरांचे तातडीने सुरक्षित ठिकाणी पुनर्वसन करण्याचा शासनाने निर्णय घेतला. त्यानुसार सन २००५-०६ यावर्षी पुर्णा नदीला आलेल्या पुरामुळे बाधित झालेल्या निळा (ता. पुर्णा, जि. परभणी) या गावाच्या पुनर्वसनासाठी सन २००८-०९ मध्ये ५६३ लाभार्थी कुटुंबांची यादी करण्यात आली होती. सदर यादीनुसार ५६३ घरकुलाचे बांधकाम २०१७ या वर्षी पूर्ण झाले आहे. सदर लाभार्थी यादीनुसार पुर-पुनर्वसनमध्ये निळा या गावासाठी ५०७ घरकुलांचे वाटप केल्यानंतर ४३ लाभार्थी यांचे नावे ग्रामपंचायत नमुना-८ ला मालमत्ता नसल्यामुळे व १३ लाभार्थी यांची नावे डबल असल्यामुळे एकूण ५६ लाभार्थी यांना अपात्र ठरविण्यात आले आहे. अशी एकूण ५६ घरकुले ही पात्र लाभार्थी नसल्यामुळे वाटपाविना शिल्लक होती. शासन निर्णय, दि.३०.५.२०१९ अन्वये मौजे निळा, ता. पुर्णा, जि. परभणी येथील पूरग्रस्तांच्या पुनर्वसनानंतर वाटपाविना शिल्लक राहिलेली १५०० चौ. फूट भूखंडावरील ४७ घरकुल व १००० चौ. फूट भूखंडावरील ९ घरकुल अशी एकूण ५६ घरकुलांची चालू बाजारभावानुसार विक्री करण्यास शासन मान्यता प्रदान करण्यात आली. तद्नंतर विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांच्या दि.२६.८.२०१९ च्या पत्रानूसार सदर शिल्लक घरांच्या विक्रीस देकार देवूनही प्रतिसाद न मिळाल्याने तसेच गरजु कुटूंब हे साधारणपणे १.०० ते १.५० लक्ष किंमतीपर्यंतच घरे घेऊ शकतात. निळा गांवामध्ये पंतप्रधान आवास योजना, रमाई आवास योजना इ. योजनांचे लाभार्थी आहेत. त्यामुळे त्यांना व्यवस्थापकिय तांत्रिक सल्लागाराचे निवासी अभियंता यांनी पुनर्वसन बांधकाम केलेल्या एका घरांचे मुल्यांकन अधिक भूखंडाची किंमत अशी अनुक्रमे १००० चौ. फुटाच्या भूखंडासाठी रु.२,७५,७३१/- व १५०० चौ. फुटाच्या भूखंडासाठी रू.२,७६,४७५/- विचारात घेऊन घरकुलांची विक्री करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

मौजे निळा, ता.पुर्णा, जि.परभणी येथील पूरग्रस्तांच्या पुनर्वसनानंतर वाटपाविना शिल्लक राहिलेली १५०० चौ.फूट भूखंडावरील ४७ घरकुल व १००० चौ.फूट भूखंडावरील ९ घरकुल अशी एकूण ५६ घरकुलांची व्यवस्थापकिय तांत्रिक सल्लागाराचे निवासी अभियंता यांनी पुनर्वसन बांधकाम केलेल्या एका घरांचे मुल्यांकन

अधिक भूखंडाची किंमत अशी अनुक्रमे १००० चौ. फुटाच्या भूखंडासाठी रु.२,७५,७३१/- व १५०० चौ. फुटाच्या भूखंडासाठी रू.२,७६,४७५/- विचारात घेऊन पुनर्वसन गांवामध्ये घरांचे वाटप करतांना पंतप्रधान आवास योजना, रमाई आवास योजना, इत्यादी योजनांच्या लाभार्थांचा विचार करून त्यांच्या कडून सदर योजनेद्वारे घरे बांधण्यास शासनाकडून मिळणारे अनुदान वगळता अशा लाभार्थ्यांकडून अनुदानाव्यतिरिक्त रक्कम शासनाकडे जमा करण्यात यावी.

सदर घरकुलांच्या विक्रीपश्चात प्राप्त होणाऱ्या निधीपैकी ८५% निधी हा मदत व पुनर्वसन विभागाच्या मुख्यमंत्री सहाय्यता निधी (नैसर्गिक आपत्ती) याकरिता State Bank of India, Branch Wodehouse Road (Colaba), (IFSC Code : SBIN००००५७२) या बँकेमध्ये "Secretary, Relief and Rehabilitation" या नावाने उघडण्यात आलेल्या खाते क्र.३४१९९१६०२९३ या खात्यात जमा करावा व १५% निधी हा "००७० इतर प्रशासनिक सेवा, ६० इतर सेवा, ८०० इतर जमा रकमा, (०१) इतर जमा रकमा, (०१)(०२) इतर बाबी (००७० ०६२६)" या जमेच्या लेखाशिर्षाखाली जमा करण्यात यावा.

प्रस्तुत शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौ.संदर्भ क्र.३९१/व्यय-९/२०१९, दि.१४.१०.२०१९ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००११५१६०४०८७७१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Chularam R Nikhare

Digitally signed by Chularam R Nikhare
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=888a9197d5a4831c7e5ef0c4328259521ba94feaafdffbadf353be3592552a31, cn=Chularam R Nikhare
Date: 2020.01.15 15:43:10 +05'30'

**( चुळाराम रा. निखारे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. विभागीय आयुक्त, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद.
२. जिल्हाधिकारी, परभणी.
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई-१,नागपूर-२
४. महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई-१, नागपूर-२
५. जिल्हा कोषागार अधिकारी, परभणी.
६. वित्तीय सल्लागार व सह सचिव (मदत व पुनर्वसन), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. वित्त विभाग (व्यय-९/अर्थसंकल्प-६), मंत्रालय, मुंबई.
८. महसूल व वन विभाग, कार्यासन म-११/ आव्यप्र-२/०आव्यप्र-६/ब-१/पीएसी/पीएसी-१, मंत्रालय, मुंबई ३२.
९. निवडनस्ती कार्यासन र-१२, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.